# सुलतानाचा ज्योतिषी

मूळ लेखक : बार्बरा आणि माईन

आतील चित्रं : जोसेफ

मराठी अनुवाद : नीलांबरी जोशी







कोणे एके काळची गोष्ट. एका गावात एक म्हातारा लाकूडतोड्या रहात होता. रोज तो आपल्या एका खांद्यावर दोर आणि कुऱ्हाड तर दुसऱ्या खांद्यावर एक पिशवी टाकून जंगलात जायचा. पिशवीत रोटी आणि पनीरचा एक तुकडा असायचा. सकाळच्या वेळी तो कुऱ्हाडीनं लाकूड तोडायचा. दुपारी बाजारात, जाऊन "सरपण घ्या सरपण.." असं ओरडून ती विकायचा. अल्लाच्या कृपेनं त्याला त्यातून पोट भरण्याइतके पैसे मिळायचे. त्या पैशांतून तो आपल्यासाठी आणि बायकोसाठी डबलरोटी, पनीरचे तुकडे आणि चार-पाच ऑलिव्ह्ज खरेदी करायचा.



त्याची बायको जर या सगळयात सुखी असती तर त्याचं आयुष्य असंच चालत राहिलं असतं. पण त्याच्या बायकोच्या मनात श्रीमंत होण्याची प्रबळ इच्छा होती. एक दिवस ती पाण्याचा हंडा घेऊन न्हाणीघरापाशी गेली. तेवढ्यात योगायोगानं तिथे चार भोई असलेला एक मेणा येऊन थांबला. त्या मेण्यातून एक स्त्री उतरली. तिचं अद्‌भुत सौंदर्य आणि महागडे चमचमते दागिने पाहून लाकूडतोड्याच्या बायकोची जवळपास शुध्दच हरपली. त्या स्त्रीचा नोकर तिचे कपडे आणि टॉवेल न्हाणीघरात ठेवायला गेला तेव्हा लाकूडतोड्याची बायको अनिमिषपणे ते न्याहाळत होती.

ज्या क्षणी ती बाई आत गेली, त्याच क्षणी लाकूडतोड्याच्या बायकोनं चौकीदाराचा अंगरखा खेचून त्याला हळूच विचारलं, “कोण आहे ती?“ “अरे, तुम्हाला माहिती नाही का?” चौकीदारानं जरा ओरडूनच विचारलं. “ती सुलतानाच्या प्रमुख ज्योतिषाची बायको आहे..!”



“ज्योतिषी” लाकूडतोड्याच्या बायकोनं गावाजवळच्या विहिरीत पाणी भरताना मनोमन विचार केला. “माझा नवरा देखील सुलतानाचा ज्योतिषी व्हायला हवा. मग मी सुंदर पोशाख आणि महागडे दागिने घालून सगळीकडे फिरेन. माझं सामान उचलायला दोन चार नोकर पुढेमागे झुलत असतील.“

त्या दिवशी आपल्या झोपडीत जाताना लाकूडतोड्याच्या बायकोला फक्त ज्योतिषी! ज्योतिषी हा एकच शब्द  ऐकू येत होता.

“तुम्हाला सुलतानाचा ज्योतिषी व्हायला हवं”. बायकोनं नवऱ्याला आग्रह केला. लाकूडतोड्या म्हणाला, “तुला वेड लागलंय. तुला वाटतंय मी एका अलिशान घरात रहावं, रेशमी कपडे घालावेत आणि गळयात सोन्याची साखळी घालून फिरावं. पण जरा माझ्याकडे पहा – मी किती लक्तरं घातली आहेत.”

बायकोनं एका आवंढा गिळला. तेव्हा परत लाकूडतोड्या म्हणाला, “मी सुलतानाचा ज्योतिषी कसा बनणार? तू अलिशान बंगल्यात रहावंस, उंची कपडे आणि दागिने घालावेस असं मला नक्कीच वाटतं. पण मी एक साधासुधा गरीब माणूस आहे.  एक डबलरोटी आणि पनीरचा तुकडा खाऊन मी आयुष्य कंठतो आहे. स्वप्नात सुध्दा मी ज्योतिषी बनायचा विचार करु शकेन का? माझी तुला विनंती आहे, जे काही आपल्याकडे आहे त्यात गुजराण करुन तू पण आनंदात रहा. आपल्याकडे छोटंसं घर आहे, पोटभर खायला मिळतंय आणि अंग झाकायला कपडे आहेत.”



पण कोणत्याही हट्टी स्त्रीला तुम्ही एखादी चांगली गोष्ट समजावून सांगू शकता का? बायकोनं आपला हट्ट सोडला नाही. नवऱ्यानं सुलतानाचा ज्योतिषी बनावं यासाठी तिनं पिच्छाच पुरवला. दरवेळी लाकूडतोड्या हेच म्हणायचा, “अगं हे कसं शक्य आहे? अशा निरर्थक गोष्टीचा तू विचार तरी कसा करतेस?” लाकूडतोड्या एक भला माणूस होता. त्याचं आपल्या बायकोवर प्रेम होतं. त्यामुळे त्यानं या विषयावर फार विचार करायचा नाही असं स्वत:शी ठरवलं.

काही दिवसांनंतर एके दिवशी लाकूडतोड्याची बायको पहाटेच उठली. बाहेर एक माणूस दवंडी पिटत होता.. “हरवली, हरवली, सुलतानाच्या मुलीची सर्वात मौल्यवान अंगठी हरवली आहे. अंगठी शोधणाऱ्याला भरघोस बक्षीस मिळेल.”

“लवकर उठा, अहो उठा..” लाकूडतोड्याच्या बायकोनं नवऱ्याला उठवलं आणि ती म्हणाली. “आपल्याला जी संधी हवी होती ती संधी दारात चालत आली आहे. तुम्ही लगेच सुलतानाकडे जा आणि त्याला सांगा की तुम्ही एक उत्तम ज्योतिषी आहात. तुम्ही त्याच्या मुलीची अंगठी शोधून काढू शकता. लवकर जा, आणि हो सुलतानाचे ज्योतिषी झाल्यावरच  या घरात तुम्हाला परत पाऊल टाकता येईल हे लक्षात ठेवा.”



लाकूडतोड्या अनेक वर्षं संसार करत होता. आता एका न परतीच्या रस्त्यावर आपण चाललो आहोत हे त्याला कळून चुकलं होतं. देवाचं नाव घेऊन मी आता ही मोहीम सुरु करतो. तो स्वत:शीच विचार करायला लागला. मग तो अंग लटपटत असताना पाऊल ओढत ओढत सुलतानाच्या घराच्या दरवाज्यापाशी पोचला.

“आपण अंगठी शोधायला आलेले ज्योतिषी आहोत” असं त्यानं तिथे सांगितलं.

त्यानंतर त्या लाकूडतोड्याला थेट सुलतानासमोर हजर केलं. “हे पहा ज्योतिषी, तू अंगठी शोधलीस तर तुला बक्षीस मिळेल. पण जर शोधता आली नाही तर मात्र त्याची किंमत चुकती करायला लागेल आणि तुझी गर्दन तलवारीनं उडवली जाईल”. सुलतानाचं फर्मान सोडलं. त्या म्हाताऱ्या माणसाकडे असं काही कौशल्य असेल याबद्दल सुलतानाला शंका होती.

“साहेब, तुम्ही काय म्हणताय ते मला कळलं.” लाकूडतोड्या म्हणाला. “पण माझी एकच विनंती आहे. तुम्ही माझी मागणी मान्य केलीत तर फार उपकार होतील.”

“बोल.. काय हवंय तुला?”



"मला चाळीस दिवस आणि चाळीस रात्री एकट्याला सोडा. मी तेव्हा अल्लाचं नाव घेऊन प्रार्थना आणि चिंतन करेन. त्यानंतर अल्लाला वाटलं तर खरं काय आहे ते बाहेर येईलच."

लाकूडतोड्याला आपण कोण आहोत याचं पुरेपूर भान होतं. तो काही कोणी ज्योतिषी नव्हता आणि हे काम त्याच्या आवाक्याबाहेरचं होतं.

सुलताननं या विनंतीवर क्षणभर विचार केला. मग तो म्हणाला, "प्रमुख ज्योतिषाची पण मला याबाबतीत काही मदत झालेली नाही. त्यामुळे हे काम करायला मी तुला चाळीस दिवस आणि चाळीस रात्रींचा अवधी देतो."

मग सुलतानानं आपल्या एका प्रामाणिक नोकराला बोलावलं. लाकूडतोड्याला तो एका खोलीत घेऊन गेला. त्या खोलीला फक्त छतापाशी एक मोठी खिडकी होती. लाकूडतोड्या त्या खोलीत गेल्यावर त्या नोकरानं बाहेरुन कुलूप लावलं. आता लाकूडतोड्याला बाहेरच्या गोंगाटाचा त्रास न होता शांतपणे विचार करता येणार होता.

दिवस जात राहिले. लाकूडतोड्या दिवसभर त्या खोलीत येरझाऱ्या घालायचा. रात्री तो आकाशातल्या चांदण्या बघत बसायचा. त्या चांदण्या तरी त्याला काय सांगणार होत्या – हेच की तो कोणी ज्योतिषी नसून एक गरीब लाकूडतोड्या आहे..!





तो ताऱ्यांच्या समूहांकडे कित्येक तास बघत बसायचा. पण त्या जंजाळात त्याला अंगठी दिसायचीच नाही. त्याला परत परत आपली लायकी काय आहे ते आठवायचं. – अल्लाच्या नजरेतून तो एक मामुली नाकतोड्यासारखा क्षुद्र माणूस होता.

सुलतानाचा नोकर रोज लाकूडतोड्यासाठी जेवण आणायचा. सुलतानाच्याच मुदपाकखान्यातून येत असल्यामुळे ते जेवण रुचकर असायचं. पण लाकूडतोड्याचं आयुष्यच आता एका क्षीण धाग्याला बांधलं गेलं होतं त्यामुळे त्याची तहानभूक संपल्यातच जमा होती.

ते जेवण लाकूडतोड्याला एकाच गोष्टीची जाणीव करुन द्यायचं – त्याच्या आयुष्याचा अजून एक दिवस कमी झाला. सुलतानाला आपण खरे कोण आहोत ते लवकरच कळेल. हे दु:ख नव्या ज्योतिषाला खात होतं.

रोज संध्याकाळी नोकरानं जेवण आणल्यावर लाकूडतोड्या फक्त एक कटोरी भरुन जेवण घ्यायचा. बाकीचं अन्न असलेलं ताट तो कोपऱ्यात ठेवून द्यायचा. हळूहळू शिळया अन्नाची ताटं वाढत गेली. तेव्हा लाकूडतोड्या स्वत:शी पुटपुटायचा.. “तीस दिवसांनी सुलतानाला सत्य कळेल किंवा एकोणतीस दिवस राहिले आहेत. नंतर सुलतानाला सत्य कळेल.”



त्या नोकराच्या मनात पण एक विचित्र भीती दाटत होती. कारण त्या प्रामाणिक नोकरानंच सुलतानाच्या मुलीची अंगठी चोरली होती. त्याला प्रामाणिक समजत असल्यामुळे त्याला सुलतानाच्या घरात अगदी आतपर्यंत प्रवेश होता. एक दिवस त्याला अंगठी दिसल्यावर त्यानं ती उचलली. कुडत्याच्या दुमडलेल्या बाहीत लपवली. आपल्यावर कोणी संशय घेणार नाही हे त्याला ठाऊक होतं. जसजसे ज्योतिषाचे दिवस पुढे चालले होते, तसतसं नोकराला ज्योतिषी काय बोलतोय ते ऐकू येत होतं.

“फक्त तीन दिवस राहिले आहेत. मग सुलतानाला कळेलच”

आता मात्र नोकराला वाटलं की आपली चोरी पकडली गेली. आता वाचण्याचा एकच उपाय होता. ज्योतिषाला खरं काय ते सांगून टाकणं. मग तो सरळ स्वभावाचा मनुष्य त्याला वाचवण्याची युक्ती शोधेल.

पुढच्या दिवशी संध्याकाळी नोकरानं खाण्याचं ताट ज्योतिषाच्या खोलीत आणून जमिनीवर ठेवलं. मग इकडे तिकडे पहात त्यानं खोलीचं दार आतून बंद केलं. मग गुडघ्यावर बसून त्यानं ज्योतिषासमोर हात जोडले आणि याचनेच्या सुरात म्हणाला, “जरा माझी कर्मकहाणी ऐका. माझ्यासारख्या नीच माणसानं केलेली हरकत ऐकून घ्या आणि मला मदत करा.”



त्यानंतर रडवेल्या सुरात हुंदके देत नोकरानं आपली रामकहाणी सांगितली. “श्रीमान, तुम्ही काल म्हणालात, फक्त तीन दिवस राहिले आहेत. मग सुलतानाला कळेलच.” नोकर म्हणाला, “आता सच्चाई समोर यायला केवळ दोनच दिवस उरले आहेत. माझ्या या एका चुकीनं अल्लाला फारसा फरक पडणार नाही. पण माझी काय हालत झाली आहे याचा तुमच्यासारख्या बुध्दिमान माणसाला अंदाजही नसेल. मी दिवसभर दु:खात चूर असतो. रात्री एक क्षण मला झोप लागत नाही. सुलतानाला जर माझ्या गुन्ह्याबद्दल कळलं तर माझी नोकरी जाईलच पण गर्दनही छाटली जाईल. माझ्यावर मेहरबानी करा. माझ्या या पापाबद्दल आणि दुष्कृत्याबद्दल सुलतानाला सांगू नका. तुम्ही मला मदत केलीत तर तुम्ही म्हणाल तसं मी करेन.”

अडोतीस दिवसांनंतर त्या लाकूडतोड्यानं पहिल्यांदा सुटकेचा नि:श्वास टाकला. खुद्द अल्लानं त्याच्यासारख्या मामुली माणसाची लाज राखली होती. त्यामुळे गुडघे टेकून बसलेल्या त्या नोकराची लाकूडतोड्याला दया आली.

लाकूडतोड्यानं नोकराचे हात हातात घेऊन दाबले आणि त्याच्या डोळ्यात पाहून म्हणाला, “तू काळजी करु नकोस. अंगठी कोणी चोरली हे कुणालाच कळणार नाही. मी हा मामला सांभाळून घेईन. कोणाला सत्य कळणार नाही आणि अंगठी पण मिळेल. तुला यासाठी एकच काम करावं लागेल. ते म्हणजे उद्या बाजारातून तू एक काळया रंगाचा कोंबडा विकत आण. लक्षात ठेव.. कोंबड्याचा एकही पंख पांढरा नसला पाहिजे.”



“मग जेव्हा महालातले नोकर नमाज पढत असतील, तेव्हा त्या कोंबड्याला तू इतर कोंबड्यांमध्ये सोडून दे. चाळिसाव्या दिवशी, कणकेत अंगठी लपवून तू त्या कोंबड्याला खायला घाल. त्यानंतरचं मी पाहून घेतो. पण मी जसं सांगितलंय अगदी तसंच कर. मग मी सुलतानाला तू केलेल्या चोरीबद्दल काहीच सांगणार नाही.”

नोकरानं त्याचा आदेश पाळायचं वचन दिलं. मग नोकर उठला, त्यानं खोलीचा दरवाजा उघडला आणि तो बाहेर निघून गेला. त्यानंतर लाकूडतोड्याला खायलाप्यायला सुचलं. यानंतर सुलतानच्या मुदपाकखान्यातून आलेलं जेवण तो भरपेट जेवला. आता त्याच्या जिवात जीव आला होता. तो खुषीत आणि उत्साहात होता.

चाळिसाव्या दिवशी भल्या पहाटे सुलतानानं आपल्या प्रामाणिक नोकराला पाठवून ज्योतिषाला आपल्या महालात बोलावलं. आता मनात शांतता असल्यानं ज्योतिषी आत्मविश्वासानं चालत सुलतानाच्या महालात प्रवेश करता झाला.

“हे बघ, तू चाळीस दिवस आणि चाळीस रात्रींची वेळ मागितली होतीस. ती मी तुला दिली.” सुलतान म्हणाला. “आता मला सांग, अंगठी कुठे आहे?”



“मी आजच्या दुपारच्या नमाजाआधी तुमची अंगठी देतो.” लाकूडतोड्या म्हणाला. “तुम्ही महालाबाहेरच्या प्रांगणात तुमच्या सगळ्या नोकरांना बोलवा.. अगदी वरिष्ठांपासून कनिष्ठांपर्यंत सर्वांना बोलवा. सोबत तुमच्या महालात कुत्री, मांजरी, घोडे, गायी, म्हशी, कोंबड्या अशी जितकी जनावरं असतील तितके सगळे जिवंत असलेले प्राणी पण मला तिथे हवेत. ते सगळे तुमच्यासमोरुन आळीपाळीनं चालत जातील. अल्लाच्या कृपेनं अंगठी मिळून जाईल.”

सगळ्यांच्या गर्दीत ज्योतिषी चोर कसा ओळखणार ते जाणून घ्यायची सुलतानाला खूप इच्छा होती. मग त्या यात्रेत सर्वप्रथम महिला आल्या. त्यांनी महागड्या कपड्यांपासून लक्तरांपर्यंत विविध पोशाख घातले होते. सगळ्यांनी बुरखा घातला होता किंवा डोक्यावर रुमाल बांधले होते. त्यांना पाहून ज्योतिषानं एकही शब्द उच्चारला नाही. मग त्या महिला आपापल्या घरी किंवा कामाला निघून गेल्या.

त्यानंतर सुलतानाच्या दरबारातल्या वजिरापासून दरबारातले सगळेजण आले. सगळ्या सरदार दरकदारांनी भरजरी कपडे घातले होते. त्यांच्यामागे सुलतानाच्या घरात काम करणारे नोकरचाकर आले. सुलतानासमोरुन जाताना त्याला कुर्निसात करुन एकेकजण निघून गेला. अजूनपर्यंत ज्योतिषानं कोणावरच आरोप केला नव्हता. लोक गुन्हेगार कोण असेल याबाबत अंदाज बांधत आपापसात एकमेकांच्या कानात कुजबुजायला लागले.



सर्वात शेवटी जनावरं आली. एकामागून एक करत ते मुके प्राणी सुलतानाच्या समोरुन जायला लागले. अचानक ज्योतिषानं एका काळ्या कोंबडीकडे निर्देश केला आणि तो म्हणाला, “महाशय, तिकडून एक काळ्या रंगाचा कोंबडा चालला आहे. त्याला पकडून कापा. तोच गुन्हेगार आहे. त्याच्या पोटात प्रिय तुम्हाला असलेली अंगठी आहे.”

मग काय..! लगोलग त्या कोंबड्याला पकडून सुलतानाच्या समोर आणलं. त्याला कापल्यावर ज्योतिषाच्या भविष्यवाणीनुसार त्याच्या पोटात सुलतानाची मौल्यवान अंगठी सापडली.



मग सुलतान ज्योतिषाकडे पाहून म्हणाला, “तुला या महान कामाबद्दल बक्षीस मिळायलाच हवं. मी तुला राजज्योतिषी हा किताब देतो. तुझ्या मर्जीनुसार तू राजवाड्याच्या शेजारच्या घरात येऊन राहू शकतोस. तिथे तू आरामात आणि मजेत आयुष्य घालवू शकतोस.”

यानंतर जरा घाबरलेल्या अवस्थेतच सुलतानाची परवानगी घेऊन लाकूडतोड्या बायकोला हे सगळं सांगायला घराच्या दिशेनं निघाला. त्यांच्या घरात जुजबीच सामान असल्यामुळे त्यांना तयार होऊन नवीन घरात जायला फार वेळ लागला नाही.

छोट्या झोपडीतून आता ते एका भव्य घरात आले होते. तिथे लाकूडतोड्याची बायको रोज आरशात आपली छबी न्याहाळायची आणि रोज नवीन कपडे घालायची. सुलतानानं दिलेल्या दागिन्यांवरुन तर तिची नजर हटत नव्हती. घरात अनेक नोकरचाकर त्यांच्या इशाऱ्यावर तैनातीला हजर होते. लाकूडतोड्याच्या बायकोच्या दृष्टिकोनातून अजून चांगलं आयुष्य काय बरं असणार होतं?

इकडे बिचारा लाकूडतोड्या काय करत होता? तो दिवसभर रिकामा बसून रहायचा. आपल्याला सुलतान कधी कोणतं काम सांगेल याची त्याला सतत काळजी वाटायची. दिवसभर तो अस्वस्थ असायचा.

त्याची बायको जितके ऐषोआराम करत होती तितकी लाकूडतोड्याची अस्वस्थता वाढत होती. कोणत्या क्षणी त्याचं सुखासमाधानाचं आयुष्य हिरावलं जाईल याची शाश्वतीच नव्हती. आरामाचं आयुष्य हा लाकूडतोड्यासाठी एक भ्रम होता.

एक दिवस घरासमोरच्या बागेत लाकूडतोड्या आपल्याच विचारांमध्ये मग्न असताना त्याची बायको तिथे आली. ती खूप अस्वस्थ होती. ती आपल्या नवऱ्याला म्हणाली, “तुम्हाला याबाबत काही तरी केलं पाहिजे. मला हे गरीबीत जिणं नकोसं झालंय.”

लाकूडतोड्या म्हणाला. “हे तू काय म्हणतीयस? मला वाटतंय आपण आता आरामात जगतोय. काही दिवसांपूर्वी आपण झोपडीत राहून मिळेल ते खात होतो तेव्हा आपण अल्लाचे उपकार मानत होतो. आज आपण या भव्य घरात रहात आहोत त्यासाठी आपल्याला अल्लाबद्दल जास्त कृतज्ञता वाटायला हवी. तू या रेशमी कपड्यांमध्ये किती सुंदर दिसत आहेस. तुझ्या गळयातला सोन्याचा हार चमचम करतोय. ही काय गरिबीची लक्षणं आहेत का?”



बायकोनं एक सुस्कारा टाकला आणि ती म्हणाली, "हे बघा. आत्तापर्यंत मी स्वत:ला खूप भाग्यवान समजत होते. पण सुलतानाचा प्रमुख ज्योतिषी राजवाड्यातच रहातो हे मला आज सकाळी कळलं. प्रमुख ज्योतिषाची बायको माझ्यापेक्षा जास्त महागडे आणि चांगले कपडे घालते. तिच्या हिऱ्यामोत्यांच्या दागिन्यांपुढे माझ्याकडचे दागिने मामुली आहेत. मी या असल्या आयुष्यात बिलकुल आनंदात नाहीये. तुम्ही सुलतानाचे प्रमुख ज्योतिषी बना. नंतरच मला आनंद लाभेल."

"माझ्या प्रिये, तू मत्सराग्नीत का बरं स्वत:ला झोकून दिलं आहेस?" लाकूडतोड्यानं बायकोला समजावण्याचा प्रयत्न केला. "आपण कष्टाळू लोक आहोत. या गोष्टी आपल्याला शोभत नाहीत. आपल्याकडे जे काय आहे त्यात तू आनंदी रहा."

तुम्ही एक वेळ उंटावरुन खड्ड्यात उडी मारुन तो खड्डा पार करु शकाल, पण मूर्ख माणसाला तर्कबुध्दिनं विचार करायला सांगू शकत नाही. लाकूडतोड्याच्या बायकोनं आता एकच लकडा लावला होता – सुलतानाच्या राजवाड्याच्या आत रहाण्याचा.. "जा" तिनं नवऱ्याला हुकूम सोडला. "तुम्ही सुलतानाचे प्रमुख ज्योतिषी होत नाही तोपर्यंत तुम्हाला या घरात जेवायला मिळणार नाही."

बिचाऱ्या लाकूडतोड्यानं आपल्या मानेमागे हातांची घडी घालून विचार करायला लागला. डोक्यावर एक छत असावं अशी लाकूडतोड्याची समजूतदार असल्यामुळे माफक अपेक्षा होती. ती त्याला जगण्यापेक्षा जास्त महत्वाची वाटत होती. त्याच्या लायकीपेक्षा आत्ताचं घर कितीतरी चांगलं होतं.

खरं तर आहे यापेक्षा चांगलं घर आपला नवरा देऊ शकत नाही हे बायकोला समजायला हवं होतं. लाकूडतोड्याला चुकीच्या भविष्यवाणीचे घातक परिणामही ठाऊक होते. प्रमुख ज्योतिषी बनणं तर दूरच, त्याला आत्ताच्या कटकटींपासून मुक्तता हवी होती. जोपर्यंत त्याच्या मनात भीती होती तोपर्यंत त्याला कोणत्याच घरात – मग ती झोपडी असो वा राजमहाल शांतता लाभणार नव्हती.

तेवढ्यात लाकूडतोड्याला एक युक्ती सुचली. ती सोपी आणि सरळ असल्यामुळे लाकूडतोड्यानं ती लगेच अंमलात आणायचं ठरवलं. सुलतानाला आपला ज्योतिषी बुध्दिमान वाटत असल्यामुळे, लाकूडतोड्यासारखा मूर्ख त्या पदाला कसा लायक ठरेल? असा विचार करुन आपण मूर्खासारखं वागलं म्हणजे सुलतान ज्योतिषावर विश्वास ठेवणंच बंद करेल असं त्यानं ठरवलं. ज्योतिषाच्या पदावरुन मुक्त झाल्यावरच तो अल्लानं दिलेलं आयुष्य आनंदात घालवू शकणार होता.

त्या दिवशी तो दुपारपर्यंत थांबला आणि सगळया लोकांनी आपलं कामकाज थांबवल्यानंतर तो महालाच्या मधोमध उभं राहून जोरजोरात ओरडायला लागला.."सुलतान.. सुलतान.. कोणी सुलतानाला पाहिलं आहे का? त्वरा करा.. त्वरा करा.. आपल्याला पटकन सुलतानाला वाचवायला हवं."



सगळ्या महालातले दरबारी आणि नोकर मग नवीन ज्योतिषाकडे धावतपळत आले.. “तुला काय वेड लागलं आहे का? आरडाओरडा करुन तू कशाला लोकांच्या आरामात व्यत्यय आणतोयस? काय विचार आहे तुझा?”

पण लाकूडतोड्यानं या प्रश्नांवर काहीच उत्तर दिलं नाही. परत तो तस्साच ओरडला.. “सुलतान.. सुलतान कुठे आहे बरं?”

काही वेळानंतर एका नोकरानं सांगितलं की सुलतान न्हाणीघरात आंघोळ करतोय. तेव्हा सुलतानाला त्रास देणं शक्यच नव्हतं.

“तू हे काय म्हणतोयस?” लाकूडतोड्या जोरात ओरडला. “डोक्यावरचं छत त्यांच्या डोक्यावर कोसळल्यावर त्यांना नक्कीच त्रास होईल. मला ताबडतोब सुलतानाला भेटायचं आहे.”

तेव्हा सुलतानाच्या दोन जवळच्या पहारेकऱ्यांनी ज्योतिषाला पकडलं. “या माणसाला वेड लागलंय.. त्यातला एकजण म्हणाला. या महालात न्हाणीघराच्या भिंती आणि छत सर्वात मजबूत आहेत.” मग ते चिंताग्रस्त लाकूडतोड्याला तिथून घेऊन गेले.

सुलतानाला न्हाणीघरातलं संगीत आणि इतर आवाजांपेक्षा वरच्या पट्टीत हे बाहेर चाललेले वाद ऐकू आले. मग सुलतान एक टॉवेल लपेटून न्हाणीघराबाहेर आला. त्याला आरडाओरडा करणाऱ्या गुन्हेगाराला सुनवायचं होतं. पण ज्या क्षणी सुलतानानं न्हाणीघराबाहेर पाऊल टाकलं त्या क्षणी न्हाणीघराचं छत कोसळलं आणि सगळा दगडविटांचा चुरा खाली पडला.

जे घडलं त्यावर सुलतानाचा विश्वासच बसेना. अचानक सुलतानाला समोर नवीन ज्योतिषी दिसला. खरं तर जे काय घडलं होतं त्याचं नवीन ज्योतिषाला जास्त आश्चर्य वाटलं होतं.

"शाबास !" सुलतान नवीन ज्योतिषाला म्हणाला. "सर्वसाधारण माणसाला ही आपत्ती येणार हे कळलंच नसतं. तू तुझ्या समजूतदार आणि विवेकीपणानं माझा जीव वाचवला आहेस. या महान कामाबद्दल मी तुला माझा प्रमुख ज्योतिषी नियुक्त करतो."

आपली योजना इतकी यशस्वी झाल्यानंतर लाकूडतोड्या आपल्या बायकोला सगळं सांगायला गेला. ते ऐकल्यावर तिचा आनंद गगनात मावेना. तिनं पटापट वजनाला कमी पण मौल्यवान वस्तू गोळा करायला सुरुवात केली. बाकीच्या वस्तू तिथेच राहिल्या तरी हरकत नव्हती. सुलतानाच्या राजवाड्याच्या आतल्या घरात किती तरी जास्त किमती आणि आरामदायक वस्तू असणार होत्या.



राजवाड्याच्या आत एक आलिशान घर त्यांच्या स्वागताला सज्ज होतं. तिथे अनेक नोकरचाकर होते. एकाहून एक उंची कपडे आणि जडजवाहिर जगातल्या कोणत्याही स्त्रीला समाधानात ठेवू शकले असते. आता लाकूडतोड्याची बायको प्रचंड खुष होती.

दुसरीकडे लाकूडतोड्या मात्र दु:खात होता. त्याची बायको जितकी समाधानी आणि आनंदी होत होती तितक्या ज्योतिषाबाबत सुलतानाच्या मागण्या वाढत चालल्या होत्या. एकच समस्या होती. त्यानंतर चिंताग्रस्त अवस्थेतल्या ज्योतिषाला सुलतानानं कोणतेच प्रश्न विचारले नाहीत. राजवाड्यातला प्रमुख ज्योतिषी असल्यामुळे त्याला सतत सुलतानाबरोबर रहावं लागत होतं. जेवताना आणि सुलतान बागेत फिरायला गेला तरी.

दुसरा कोणी असता तर त्याला यात खूप अभिमान आणि गर्व वाटला असता. पण साध्याभोळ्या लाकूडतोड्याला मात्र या सगळ्यात मजा वाटत नव्हती. आपण इतक्या मोठ्या हुद्द्यापर्यंत पोचू असं त्याला स्वप्नातही वाटलं नव्हतं. आपल्या एका चुकीनं आपण आकाशातून धाडकन जमिनीवर कोसळू याची त्याला पूर्ण जाणीव होती. नाकतोड्यासारख्या एका क्षुद्राचे दुबळे पाय हा हुद्दा पेलायला असमर्थ होते. कल्पनेतलं हे जग एक दिवस डोळ्यासमोरुन निघून जाईल हे त्याला माहिती होतं.

त्यामुळे सुलतानाचे कोणी खास पाहुणे जेवायला आले तर प्रमुख ज्योतिषी एकदम चुपचाप असायचा. बाकी सगळेजण आपण सुलतानाच्या किती जवळ आहोत ते दाखवण्यात मश्गुल असायचे.

सुलतानाला हे सगळं कळत होतं. मग एक दिवस ज्योतिषाची परीक्षा घ्यायची असं सुलतानानं ठरवलं. संध्याकाळच्या वेळी सगळे लोक बागेत फिरत असताना सुलतानानं वाकून आपल्या मुठीत काहीतरी पकडलं. मग आपली बंद मूठ ज्योतिषासमोर धरुन त्यानं विचारलं, “तुझ्यात कमालीचं सामर्थ्य आहे. आज आपल्या राजवाड्यातल्या दरबारातल्या सगळया लोकांना तुझ्या सामर्थ्याचा पुरावा दाखवावा असं मला वाटतंय. मी माझ्या मुठीत एक छोटीशी गोष्ट पकडली आहे. ती गोष्ट काय आहे हे तू सांगू शकलास तर मी तुझी हवी ती इच्छा पूर्ण करेन. माझ्याकडे सत्ता आहे आणि तू जे मागशील ते मी तुला देईन. तू तुझ्या क्षमतेनं माझ्या मुठ्ठीत काय आहे ते सांगू शकशील?”

बिचाऱ्या लाकूडतोड्याला या क्षणाचीच भीती होती. त्याच्याकडे या प्रश्नाचं काही उत्तर नव्हतं. सुलतानानं बागेतून जे काही उचललं होतं आणि मुठीत बंद केलं होतं त्यात नाकतोड्यासारख्या एका माणसाचं आयुष्यच कैद झालं होतं. ज्या माणसाच्या नशिबानं त्याला आज ज्योतिषी बनवलं होतं.



निराशेमुळे त्या वृध्द लाकूडतोड्याला आपल्या गावाकडची एक दंतकथा आठवली. “नाकतोडा जेव्हा पहिल्या वेळी उडी मारतो तेव्हा वाचतो. दुसऱ्या वेळी उडी मारतो तेव्हा कसाबसा जिवंत रहातो. तिसऱ्या वेळी मात्र नक्कीच पकडला जातो.” हे सांगून तो सुलतान काय म्हणतो याची वाट पहात थांबला. या दंतकथेत त्या गरीब लाकूडतोड्याचं आयुष्य सामील होतं. हेच त्याच्या आयुष्याचं वास्तव होतं. यापेक्षा वेगळं त्या गरीबाला काही माहिती नव्हतं.

जेव्हा सुलतानानं आपली मूठ उघडली तेव्हा त्यातून एक नाकतोडा निघाला. “लोकहो बघा..” तो आपल्या दरबारातल्या लोकांना म्हणाला. “या माणसात जबरदस्त क्षमता आहेत. हा कोणी मामुली मनुष्य नाही. प्रमुख ज्योतिषा, तुला काय हवं ते माग. मी ते तुला नक्कीच देईन.”

आता लाकूडतोडा खुष झाला होता. त्याच्या अंत:करणावरचं ओझं उतरलं होतं. तो अदबीनं वाकून म्हणाला, “अल्लाच्या कृपेनं मी तुमची थोडीफार सेवा करु शकलो. माझी आता एकच इच्छा आहे. मला तुमचं हे ज्योतिषीपद नको. मला फक्त अल्लाचं गुणगान करत आरामात आयुष्य कंठायचंय.”

“तुझी इच्छा जरुर पूर्ण होईल. सुलतानाचं जाहीर केलं. राजवाड्यातलं घर आता तुझंच आहे. तू तुझ्या मर्जीनुसार दरबारात ये जा करु शकतोस. मी तुला या क्षणी प्रमुख ज्योतिषाच्या जबाबदारीतून मुक्त करतो. आता तू आपलं उरलेलं आयुष्या सुखासमाधानात व्यतीत कर.”

यानंतर त्या गरीब लाकूडतोड्यानं आपल्या बायकोबरोबर उरलेलं आयुष्य सुलतानाच्या राजवाड्यात घालवलं. तिथे त्याला उत्तम जेवण मिळत होतं. त्याची नजर मात्र कायम आभाळाकडे असायची, जिथून परवरदिगार नाकतोड्यासारख्या त्या माणसावर आपली कृपादृष्टी ठेवून होता.

समाप्त

